राज्यस्तरीय सनियंत्रण समितीचे
पुनर्गठन करण्याबाबत

2004071915485800 1-2500

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग,**
**शा.नि.क्र : जेजेए-२००१/प्र.क्र-७९/का-३**
**नवीन प्रशासन भवन, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : २४ नोव्हेंबर , २००३.**

**वाचा** : १. महिला व बाल विकास विभागाचा शासन निर्णय क्रमांक निरिगृ-२०००/प्र.क्र. १५२/का-३ दिनांक २८ ऑगस्ट २०००.
२. महिला व बाल विकास विभागाचा शासन निर्णय क्रमांक जेजेए-२००३/प्र.क्र.२१४/का-३ दिनांक ३ नोव्हेंबर २००३.

**प्रस्तावना :** राज्यातील निरिक्षणगृह, बालगृह, अनाथालय, बाल कल्याण मंडळे यांच्या कामकाजाचे पर्यवेक्षण करणे, बाल न्याय अधिनियम १९८६ अंतर्गत स्थापन करण्यात आलेली बाल कल्याण मंडळे, अभ्यांगत मंडळ, सल्लागार मंडळ यांच्या नेमणुकिबाबत शासनास सल्ला देणे याकरिता मा. उच्च न्यायालयाने रिट पिटीशन क्रमांक ११०७/१९९६ च्या अनुषंगाने दिलेल्या आदेशानुसार दिनांक २८ ऑगस्ट २००० च्या शासन निर्णयान्वये राज्यस्तरीय सनियंत्रण समिती गठीत करण्यात आली होती. आता बाल न्याय अधिनियम २००० अस्तित्वात आल्यामुळे या अधिनियमांतर्गत स्थापन करावयाच्या राज्यसल्लागार मंडळाच्या अनुषंगाने वरील राज्यस्तरीय सनियंत्रण समितीचे पुनर्विलोकन करण्याची बाब मा. उच्च न्यायालयाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** मा. उच्च न्यायालय याचिका क्रमांक ११०७/१९९६ च्या अनुषंगाने मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशानुसार राज्यस्तरीय सनियंत्रण समितीचे खालीलप्रमाणे पुनर्गठन करण्यात येत आहे.

१) निवृत्त न्यायमुर्ती हॉस्बेट सुरेश - अध्यक्ष
२) डॉ. आशा बाजपेयी, मुंबई - सदस्य
३) श्रीमती कालिंदी मुजुमदार, मुंबई - सदस्य
४) डॉ. शरद भौमिक, मुंबई - सदस्य

२) बाल न्याय अधिनियम २००० अंतर्गत स्थापन करण्यात आलेल्या राज्य सल्लागार मंडळाकडून सनियंत्रण समितीच्या सर्व सदस्यांना अधिकार पत्र किंवा ओळखपत्र दिले जाईल. जेणेकरुन सदस्यांना राज्यातील शासकिय अथवा खासगी बालकांच्या संस्थांना भेट देणे शक्य होईल.

३)   बाल न्याय विषयक राज्य सनियंत्रण समिती प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग यांना योग्य कार्यवाही करीता अहवाल सादर करील .

४)   राज्य सनियंत्रण समितीच्या सदस्यांनी समितीच्या कामानिमित्त केलेल्या प्रवासाची मूळ देयके महिला व बाल विकास विभागाकडे सादर करावी. विभागाला ही देयके प्राप्त झाल्यापासून ६ आठवड्यांच्या आत त्यांची प्रतिपूर्ती करण्यात यावी.

याव्यतिरीक्त इतर बाबी शासन निर्णय क्रमांक - निरीगृ २०००/प्र.क्र. १५२/का-३ दिनांक २८ ऑगस्ट २००० व महिला व बाल विकास विभागाचा शासन निर्णय क्रमांक जेजेए-२००३/प्र.क्र.२१४/का-३ दिनांक ३ नोव्हेंबर २००३ मध्ये नमूद केल्यानुसार राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(पां. वि. केरकर)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

महालेखापाल महाराष्ट्र राज्य.
लेखा परिक्षा, मुंबई / नागपूर.
लेखा अनुज्ञेयता, मुंबई / नागपूर.
निवृत्त न्यायमूर्ती, हॉस्बेट सुरेश - अध्यक्ष, राज्य सनियंत्रण समिती.
प्रधान सचिव, महिला व बाल विकास , मंत्रालय , मुंबई.
सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग , मंत्रालय , मुंबई .
श्रीमती आशा वाजपेयी, सामाजिक कार्यकर्ती - सदस्य, राज्य सनियंत्रण समिती.
श्रीमती कालिंदी मुजूमदार, सामाजिक कार्यकर्ती - सदस्य, राज्य सनियंत्रण समिती.
डॉ. शरद भौमिक, मुंबई विद्यापीठातील समाजशास्त्र विषयाचे प्रमुख - सदस्य, राज्य सनियंत्रण समिती.
प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
उप सचिव (वित्त विभाग) , मंत्रालय , मुंबई.
आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व जिल्हाधिकारी.
जिल्हा, महिला व बाल कल्याण अधिकारी.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवड नस्ती का - ३.